# क्लाराचे नवे जग

जनेट विंटर



क्लाराचे कुटुंब स्वीडनमध्ये एक सुखवस्तू जीवन जगण्यासाठी धडपड करत आहे. पण त्यांच्याकडे असलेला जमिनीचा तुकडा नापीक आहे. शिवाय तिथे दुष्काळ पडला आहे. घरातील अन्नधान्य संपत आले आहे. परिस्थिती बदलली नाही तर क्लाराला जमिनीच्या मालकाकडे काम करावे लागेल. पण ती फक्त आठ वर्षांची आहे.

एक दिवस अमेरिकेतून त्यांना पत्र येते. त्यामध्ये सुंदर, सुपीक आणि भरपूर जमीन असलेल्या भूमीचे वर्णन केले आहे. जहाजाने या नव्या जगात जाण्याबद्दल चाललेली आईवडिलांची चर्चा रात्री उशीरा क्लारा ऐकते. याचा अर्थ तिला इकडचे घर, गाव, सवंगडी एवढेच नाही तर आजोबांनासुद्धा सोडून जावे लागणार!

19 व्या शतकात अमेरिकेत स्थलांतर करण्याच्या लाटेत हजारो मुलांनी केलेला प्रवास जनेट या कथेतून सांगते. ही कथा स्कँडिनेवियन प्रवाशांची पत्रे व रोजनिशींवर आधारित आहे. कथेत एका लहान मुलीचा नव्या जगात (अमेरिकेत) जाण्याचा असामान्य प्रवास वर्णन केला आहे.

# क्लाराचे नवे जग



जनेट विंटर

आमची जमीन नापीक आणि खडकाळ होती. बाबांनी रोपं लावण्यासाठी जमीन चांगली करण्याचा खूप प्रयत्न केला. पण तरीही त्यात पुरेसं अन्नधान्य पिकत नाही. यावर्षी तर पाऊस-पाणीसुद्धा झालेलं नाही. पीकं मरतायत. आईबाबांना चिंता पडलीय की हिवाळ्यात आम्ही काय खायचं?

आमची म्हातारी गाय आता दूध देत नाही. नुकतंच आम्ही आमच्या शेवटच्या डुकराला मारून आमचं पोट भरलं. घरातलं भाकरी बनवण्याचं पीठसुद्धा संपलंय. हे सगळं बदललं नाही तर मला जमीनमालकाकडे बाळाच्या पाळण्याला झोके द्यायचं किंवा बदकं आणि डुकरं राखायचं काम करावं लागेल. मी फक्त आठ वर्षांची असली तरी मला ही कामं करावी लागतील.



मग एक दिवस बाबांना अमेरिकेतून एक पत्र आलं:

मातृभूमीतल्या प्रिय मित्रा निल्स,

तुला, तुझ्या पत्नीला आणि मुलगी क्लाराला माझ्या परिवारातर्फे शुभेच्छा. स्वीडन आणि स्मालँड सोडून आम्ही अमेरिकेला आलो हे खूप बरं केलं. इकडची जमीन सुपीक आहे. आम्ही जे काही पेरलं त्यातून भरघोस पीक उगवलं. आता आम्ही रोज चपात्या आणि मांस खातो. घरी हवं तेवढं दूध, लोणी आणि अंडी असतं. इथले प्राणी आकाराने मोठे आणि निरोगी आहेत. कष्ट करणारा कुणीही इथे सुखात जगू शकतो.

जगातल्या सगळ्या देशांचे लोक इथे गुण्यागोविंदाने राहातात. प्रत्येकाला आपल्या धर्माचं पालन करण्याचं स्वातंत्र्य इथे आहे.

तुम्हीसुद्धा अमेरिकेत आलात तर मला आनंद होईल. इथे सगळ्यांसाठी पुरेशी जागा आहे. येणार असाल तर तिकडचं सारं सामान विकून टाका. तुम्हाला प्रवासासाठी आणि इथे जमीन विकत घेण्यासाठी काही पैसा सोबत आणावा लागेल. तेवढंच सामान आणा जे तुम्हाला उचलता येईल. प्रवासात खराब होणार नाही असंच अन्न सोबत घ्या. तुम्ही अमेरिकेत येण्याची मी वाट बघतोय.

तुझा दूरदेशीचा मित्र

बर्टल

रोज संध्याकाळी बाबा हे पत्र आईला वाचून दाखवतात. रात्री उशीरा मी त्यांची कुजबूज ऐकलीय. चांगलं आयुष्य जगण्यासाठी ते अमेरिकेत जायचं म्हणतायत. म्हणजे, इथलं सारं सोडून जायचं! घर, काका-काकी, त्यांची मुलं, एवढंच नाही तर आजोबांनासुद्धा!



शेवटी आमचं अमेरिकेला जायचं ठरलं. आम्ही वसंतऋतूत प्रवासाला निघू. पण आता हिवाळ्यातच प्रवासाची तयारी सुरू केलीय. आई हातमागावर बसून नवीन कपड्यांसाठी कापड विणतेय. बाबांनी सामान भरण्यासाठी मोठी पेटी बनवलीय. आजोबांनी ती पेटी सजवलीय. आम्ही आमचं बरंचसं सामान विकून टाकलंय. मिळालेल्या पैशातून आम्ही प्रवासादरम्यान जहाजावर जेवण खरेदी करू. मी आईला भाकरी बनवायला मदत केली. आम्ही खारवलेले मासे, खारवलेलं डुक्कर आणि सुकवलेलं गोमांस बनवलंय. आम्ही चीज, लोणीसुद्धा बनवलंय आणि बरीचशी सफरचंदही सुकवलीयत.





वसंत ऋतू आल्यावर आम्ही गरज नसलेल्या सामानाचा लिलाव केला. बाबांचा नांगर, सुंदर जुनं घड्याळ, आईचा हातमाग, मला तिने झुलवलं तो पाळणा, आजोबांनी माझ्यासाठी बनवलेली छोटी गाडी हे सगळं आम्ही विकून टाकलं. आम्ही आमची म्हातारी गाय दान करून टाकली. आम्हाला या वस्तुंची खूप आठवण येईल. पण सगळ्यात जास्त आठवण येईल, आजोबांची. या वयात त्यांना अमेरिकेचा प्रवास झेपणार नाहीत म्हणाले ते. त्यांना आजीजवळच राहायचंय. आजी चर्चच्या कबरीत झोपलीय.

जाण्याआधी काही दिवस आम्ही पिशव्या आणि पेट्यांमध्ये आमचं सामान भरलं. आम्ही बाबांची जड अवजारं, त्यांची बंदूक आणि मासेमारीचं सामान पेटीच्या तळाशी ठेवलं. त्यावर आमच्या किटल्या, भांडी, लाकडी थाळ्या, कप, चाकू आणि काटे ठेवलं. मग त्यावर आईचा चरखा, सुईधागा, बिछाना, साबण, कपडे आणि बायबल ठेवलं. आम्ही पिशव्यांमध्ये सुकवलेलं मांस, खारवलेले मासे, भाकरी, चीज, लोणी, पीठ, कॉफी, साखर, बटाटे, सुकवलेले सफरचंद, मीठ, काळी मिरी आणि जहाज लागू नये म्हणून ब्रँडी भरली.



एक दिवस सकाळी-सकाळी मॅग्नसकाका त्यांची गाडी घेऊन घरी आले. ते आम्हाला जहाजावर सोडणार होते. आम्ही आमचं सामान गाडीत भरलं. आमचे नातेवाईक, मित्र, शेजारी आम्हाला निरोप द्यायला आले. मी आजोबांना मिठी मारली, शेवटची. त्यांनी माझ्या हातात एक छोटीशी थैली दिली. “क्लारा, यात बियाणं आहेत. ती अमेरिकेत पेरायची. स्वीडनला विसरू नकोस,” आजोबा म्हणाले.

आम्ही दूर नजरेआड होईपर्यंत आजोबा आम्हाला हात हलवून निरोप देत होते. मी त्यांनी दिलेली बियाणांची थैली हातात घट्ट धरून ठेवली. रस्त्यावर सगळे शेजारी शेवटचा निरोप घ्यायला जमले होते. “तुम्हीसुद्धा अमेरिकेत या. तिथे भेटू,” बाबा त्यांना म्हणाले.



आम्ही दिवसभर मॅग्नसकाकांच्या गाडीने प्रवास केला. त्या संध्याकाळी आम्ही गोथनबर्ग बंदरावर पोहोचलो. तिथे अमेरिकेला निघालेली आमच्यासारखीच खूप लोकं होती. एवढ्या साऱ्या लोकांसाठी आमचं जहाज खूप छोटं वाटत होतं. मॅग्नसकाकांनी आमचं सामान जहाजावर चढवायला मदत केली. मग जहाजाच्या कप्तानाने प्रवाशांना पोहोचवायला आलेल्या लोकांना किनाऱ्यावर जायला सांगितलं. मग आम्ही मॅग्नसकाकांचा निरोप घेतला.

जहाजाच्या डेकखाली काळोख आणि गर्दी होती. काही दिसत नव्हतं की हलतडुलता येत नव्हतं. पुढचे काही दिवस आम्हाला असेच काढावे लागणार होते. आमच्या लहानशा जागेत वाळलेल्या चाऱ्याचा खडबडीत बिछाना होता. आम्ही पेटीला टेबल म्हणून वापरलं. बाबांनी दोन खुंट्यांच्यामध्ये ब्लँकेट बांधून मला झोपायला बिछाना बनवला. आईने किटली, भांडी आणि थाळ्या काढल्या. जहाजावर असलेल्या स्टोव्हवर ती जेवण बनवायला जायची. प्रत्येकाची स्टोव्ह वापरण्याची पाळी ठरलेली होती. एवढ्या सगळ्या कुटुंबांसोबत राहायचं थोडं त्रासाचंच होतं. तरी लोकं हसमुख आणि आनंदी होते.





पुढच्या सकाळी आमच्या जहाजाचा प्रवास सुरू झाला. स्वीडनचं शेवटचं ओझरतं दर्शन घेण्यासाठी आम्ही डेकवर उभे राहिलो. तिथे एक पाद्री निरोपाचं धार्मिक प्रवचन देत होता. आम्ही सुरक्षित प्रवासासाठी देवाची प्रार्थना केली. किनारा दृष्टीआड गेल्यावर बाबांच्या डोळ्यात पाणी आलं. ते पुटपुटले, “हे मातृभूमी! तुझा निरोप घेतो.”

प्रवासादरम्यान आई, बाबा आणि मी जास्त काळ डेकवर राहिलो. तिथे आम्ही थंड वाऱ्याच्या झुळका खाल्ल्या. समुद्रप्रवासात आजारी पडलेले लोक डेकच्या खाली कोंदट हवेत थांबले.

आभाळ मोकळं असलं की छोट्याशा डेकवर गर्दी व्हायची. आम्ही इतर प्रवाशांना आमचा घरचा खाऊ वाटला आणि गोष्टी सांगितल्या. मला नवे मित्र मिळाले. आम्ही लपंडाव खेळलो. आमच्याच गावातून आलेल्या म्हाताऱ्या गुस्तावने व्हायोलिन वाजवलं. त्यावर आम्ही गाणी म्हटली, नाचलो. रविवारी सकाळी पाद्री प्रार्थना म्हणत आणि गुस्ताव व्हायोलिनवर भजन वाजवी.



एके दिवशी वारे वेगाने वाहू लागले. समुद्रात वादळ आलं. जहाज खूप हेलकावे खाऊ लागलं. आम्हाला चालणंसुद्धा कठीण झालं. डेकवर थंडगार वाऱ्याचे झोत वाहू लागले. आम्ही सारे डेकच्या खाली थांबलो. पेट्या आणि बाकडी पछाडल्यागत इकडे-तिकडे सरकू लागले. दुधाची, बियरची लाकडी पिंप घरंगळून एकमेकांना धडकू लागली आणि त्यातलं सारं बाहेर सांडलं. खलाशांनी पावसापाण्यापासून आमचा बचाव करण्यासाठी डेकच्या खाली जाण्याचा दरवाजा बंद केला. त्यामुळे थोड्या वेळाने आम्हाला श्वास घेणं कठीण झालं. कुणीही जेवण बनवू शकलं नाही. पिण्यासाठी ताजं पाणीसुद्धा उरलं नाही.





मी चक्कर येऊन तापाने फणफणले. आईबाबा माझी काळजी घेऊ लागले. मला आजोबांचे शब्द आठवले, “स्वीडनला विसरू नकोस.”

वादळ दोन दिवस दोन रात्र चाललं. तिसऱ्या दिवशी समुद्र शांत झाला. माझा तापसुद्धा उतरला. पण इतर काही प्रवासी अजून आजारीच होते. जहाजावरच्या लोकांमध्ये ताप पसरत गेला.

त्या रात्री आठ महिन्यांचं एक लहान मूल मेलं. जहाजाच्या सुताराने त्याच्यासाठी एक छोटी शवपेटी बनवली. आम्ही भजन गायलं. कप्तानाने प्रार्थना म्हटली. मग दुसऱ्या दिवशी दुपारी खलाशांनी शवपेटी समुद्रात सोडून दिली. लाटांनी तिला आपल्या पोटात गडप केलं.



दोन महिने आम्ही फक्त आभाळ आणि पाणीच पाहिलं. तापामुळे आणखी काही लोक मेले. आमचं अन्न संपत चाललं, खराब होत चाललं. पण एक नवं आयुष्य जगायला मिळणार अशी आशा लोकांना होती. असा प्रवास आयुष्यात एकदाच करायला मिळतो, असं काहीतरी बाबा आईला सांगत होते. आपल्याला स्वीडन पुन्हा पाहायला मिळणार नाही, हे कळून चुकलं होतं. मी आजोबांनी दिलेली थैली घट्ट पकडून ठेवली.

एक दिवस जहाजाच्या कठड्यावर एक लहानसा पक्षी येऊन बसला. तो समुद्रात खूप दूरवर आला होता. आपल्या थकलेल्या पंखांना तो आराम देऊ लागला. जमिनीवरून जहाजावर आलेला तो आमचा पहिला दूत होता. पुढच्या काही दिवसांत आम्हाला आणखी काही पक्षी आणि डॉल्फिन दिसले. आई म्हणाली की अमेरिका आता खूप जवळ आलंय. मग कुणीतरी ओरडलं, “जमीन!” सगळे लोक कठड्याला धरून पाहू लागले. शेवटी आम्ही अमेरिकेला पोहोचलो.



मग आम्ही एका मोठ्या खाडीतून प्रवास केला. तिथे अनेक देशांची जहाजं आपले झेंडे फडकावत फिरत होती. काय भव्य दृश्य होते ते! किनाऱ्यावरची घरं राजवाड्यासारखी दिसत होती. कप्तानाने आम्हाला समोरचं मॅनहॅटन बेट आणि त्याच्या दोन बाजुंना असलेली स्टेटन आणि ब्रुकलिन बेटं दाखवली.

आमचं जहाज दोन दिवस खाडीत नांगर टाकून उभं राहिलं. तिकडच्या डॉक्टरांनी सगळ्या प्रवाशांना तपासलं. कुणाला देवी सारखा गंभीर आजार नाही, याची त्यांनी खात्री करून घेतली. जहाजातून उतरल्यावर आम्हाला वाफेच्या बोटीतून मॅनहॅटन बेटावरील एका गोल इमारतीत घेऊन गेले. त्या इमारतीचे नाव होते – कॅसल गार्डन.



त्या इमारतीत वेगवेगळ्या देशांतून आलेली आमच्यासारखी शेकडो माणसं होती. त्यांच्यामध्ये नॉर्वेजियन, फिनिश, इंग्लिश, जर्मन, डच, रशियन, आयरीश आणि इटालियन लोक होते. हे सगळे आपापल्या मातृभाषेतून बोलत होते. मला सारं विचित्रच वाटलं कारण मला त्यांच्या बोलण्यातलं काहीएक समजत नव्हतं.

आम्हाला इमिग्रेशन ऑफिसात नोंदणी करावी लागली. एक गाइड बाबांशी स्वीडीश भाषेत बोलला. तो बाबांकडे असलेला स्वीडीश पैसा बदलून अमेरिकन पैसा मिळवून देण्यास तयार झाला. त्याने मिनेसोटा राज्यातल्या बर्टलच्या घरी जाण्यासाठी रेल्वे आणि वाफेच्या बोटीचं तिकिट काढण्यासाठीसुद्धा मदत केली.

बाबांचं काम झाल्यावर ते कॅसल गार्डनच्या बाहेर गेले आणि रस्त्याकडेच्या फेरीवाल्यांकडून ताज्या भाकऱ्या आणि दूध खरेदी करून घेऊन आले. ते सोबत संत्र आणि केळीसुद्धा घेऊन आले. ही फळं मी पूर्वी कधी पाहिली नव्हती. त्यांच्याबद्दल फक्त ऐकलं होतं. खूप दिवस समुद्रात राहून आल्यामुळे हे अमेरिकन मला अन्न खूप चविष्ट वाटलं.



त्या रात्री आम्ही कॅसल गार्डनमधल्या एका बेंचवर झोपलो. सकाळी आईबाबांनी आणि मी जहाजात ओळख झालेल्या लोकांचा निरोप घेतला. आमचे मार्ग आता आम्हाला वेगवेगळ्या दिशांना घेऊन जाणार होते. फक्त व्हायोलिन वाजवणारा गुस्ताव आमच्यासोबत मिनेसोटाला जात होता.

आम्ही आमची पेटी, पिशव्या, टोपल्या एका मोठ्या वाफेच्या बोटीवर ठेवलं. छान-छान पोशाख घातलेले लोक बोटीच्या वरच्या डेकवर होते. आम्हाला अमेरिकेत आलेल्या नव्या लोकांसोबत खालच्या डेकमध्ये बसवलं. तिथे खूप गर्दी होती. आम्ही सारे पश्चिमेकडे चाललो होतो. पण आम्हाला एकमेकांची भाषा समजत नव्हती. त्यामुळे सभोवती लोकांची गर्दी असूनही मला एकटंएकटं वाटू लागलं.



वाफेची बोट आम्हाला हडसन नदीतून न्यूयॉर्क राज्यातल्या आल्बनी शहरात घेऊन गेली. तिथे आम्ही ट्रेनने प्रवास केला. ट्रेनच्या हेलकाव्यांनी मला लवकर झोप आली. सकाळी उठल्यावर खिडकीबाहेर मला जाडजुड गायी कुरणात चरताना दिसल्या. ते पाहून आईबाबा खूप खुश झाले.

अमेरिका केवढी मोठी आहे! आम्ही अजून न्यूयॉर्क राज्यातच होतो आणि मिनेसोटा खूप दूर होतं. आम्ही बफेलो शहरात पोहोचलो तेव्हा ट्रेन सोडली. तिथून मोठमोठी सरोवरं पार करण्यासाठी आम्ही पुन्हा वाफेच्या बोटीत चढलो. बाबांनी मला या सरोवरांची नावं सांगितली –इरी, ह्युरॉन, सुपिरियर, ऑन्टारियो आणि मिशिगन. तीन दिवस मला वाटलं की मी पुन्हा समुद्रातच प्रवास करतेय. म्हाताऱ्या गुस्तावने डेकच्या खालच्या भागातील प्रवाशांना व्हायोलिनवर काही प्रसिद्ध गाणी वाजवून दाखवली.





शिकागो शहरात आम्ही पुन्हा पण शेवटचंच एका छोट्या वाफेच्या बोटीत बसलो. या बोटीने आम्हाला मिसिसिपी नदीला मिळणाऱ्या एका कालव्यामध्ये नेलं. जसजशी आमची बोट उत्तर दिशेत जाऊ लागली तसतसं काठावरचं जंगल अधिकाधिक गर्द होत गेलं. एकदा मी झाडांआड दडून आम्हाला निरखणाऱ्या स्थानिक इंडियन लोकांना पाहिलं. म्हातारा गुस्ताव मिनेसोटातल्या वाबाशा शहरात उतरला. तिथे त्याचा मुलगा त्याची वाट बघत होता. आम्ही उत्तरेकडचा प्रवास सुरू ठेवला आणि रेड विंग शहरात पोहोचलो. आजोबांना निरोप देऊन आता तीन महिने झाले होते.

आता बर्टलचं घर कसं शोधायचं? आमच्याकडे फक्त एका कागदावर बर्टलचं आणि त्याच्या शहराचं नाव लिहिलं होतं. स्वीडीश बोलणारं कुणी आम्हाला भेटलं नाही. शेवटी बाबांनी इशारे वगैरे करून सामानासाठी एक बैलगाडी भाड्याने घेतली.

आम्ही जंगलातून कित्येक मैल चाललो. मग एका खुल्या मैदानात आम्हाला एक माणूस लाकुडतोड करताना दिसला. बाबांनी त्याला आवाज दिला. तो बर्टल होता. आम्हाला पाहून त्याने हातातली कुऱ्हाड खाली टाकली आणि तो आमच्याकडे धावला. बर्टलची बायको, ॲना खांद्यावरचं मूल घेऊन घराबाहेर आली. आम्ही एकमेकांना मिठ्या मारल्या आणि आनंदाने रडलो.



पुढच्या दिवशी बाबा आणि बर्टल आमच्यासाठी जमीन शोधायला बाहेर पडले. जमिनीत चांगली माती, भरपूर पाणी आणि झाडं असलीच पाहिजेत. बाबांनी हवी तशी जमीन खरेदी करण्याआधी मला आणि आईला दाखवली. जमीन पाहिल्यावर मला वाटलं की आता बाबांना पुन्हा कधी मोठमोठे खडक फोडत बसावं लागणार नाही.

बाबा आणि बर्टलने जंगल साफ करून एक रस्ता बनवला. आमचं नवं घर बनवण्यासाठी त्यांनी झाडं कापली. बाबा आणि बर्टलने झटपट कामं केली. मी भिंतीच्या दोन ओंडक्यांमधील भेगा मातीने बुजवून त्यांना मदत केली. फक्त सातच दिवसांत घर बनलं. ते स्वीडनमधल्या घरापेक्षा लहानच होतं. नव्या घरात फक्त एकच खोली होती. जुन्या घरासारखंच या घरांचं छतही चाऱ्याचं होतं. स्टूल बनवण्यासाठी बाबांनी झाडाचा बुंधा कापला. आम्ही आमची पेटी पुन्हा टेबल म्हणून वापरली. बाबांनी ओंडक्यांचा पलंग बनवला. ते म्हणाले की थंडीच्या ऋतूत ते चांगलं टेबल आणि खुर्च्या बनवतील. घर बनल्यावर आईला खूप आनंद झाला. तिला आता लगेच फर्निचरची आवश्यकता वाटत नव्हती. मी तिला आमच्या सामानातल्या वस्तू नीट ठेवायला मदत केली.



बाबांनी बर्टलकडून बैल उधार घेतले आणि जमीन नांगरली. रोपटी लावताना त्यांनी आजोबांनी दिलेलं बियाणं लावण्यासाठी थोडी जागा मोकळी ठेवली. वसंतऋतूआधी आम्हाला गहू, बटाटा आणि सलगमचं भरपूर पीक मिळालं. सगळ्यात मोठी गोष्ट म्हणजे, आजोबांनी दिलेल्या बियाणांतून उगवलेल्या फुलांना चांगला मोहोर आला.



एका हिवाळ्यात रात्री बाबांनी अमेरिकेतून आजोबांना पहिलं पत्र लिहिलं:

तीर्थरुप बाबा,

स्वीडनपासून इतक्या दूर आल्यावरही आम्ही तुम्हाला विसरलेलो नाही. आमची सगळ्यांची तब्येत खूप छान आहे. अमेरिकेत आम्ही छान रुळलोय. आपल्याला हवी तशी सुपीक जमीन मिळालीय. इथे सगळी पिकं भरघोस पिकतात. इथे आपल्याकडे पन्नास एकर जमीन आणि एक छोटंसं घर आहे. नुकतंच आम्ही पहिल्या पिकाची कापणी केलीय. आम्ही आपल्या मालकीच्या तळ्यात मासे पकडतो आणि जंगलात शिकार करतो. ही जमीन गरजेच्या सगळ्या गोष्टी पुरवते, अगदी झाडू, चमचे आणि खेळणीसुद्धा. पण आम्हाला तुमची खूप आठवण येते. मी माझ्या बालपणीच्या घराला कधीच विसरू शकत नाही.

निल्स, एस्ट्रिड आणि क्लाराकडून सप्रेम.

क्लाराने तुम्हाला ही फुलं पाठवलीयत. ती तुमची खूप आठवण काढते.






एकोणीसाव्या शतकाच्या उत्तरार्धात क्लारासारख्या हजारो मुलांनी आपल्या कुटुंबासोबत एक चांगले जीवन जगण्यासाठी अमेरिकेचा प्रवास केला. त्याकाळात स्वीडन एक राजा, उमराव आणि काही श्रीमंत जमीनदारांच्या अंमलाखाली होता. क्लारा आणि तिचे कुटुंब गरीब शेतकरी होते. त्यांच्याकडे जमिनीचा एक छोटासा खडकाळ तुकडा होता. सर्वात सुपीक जमीन एका श्रीमंत जमीनदाराकडे होती. गावातील अनेक मुले त्याच्याकडे काम करत.

सत्तेतील लोक गरीब शेतकऱ्यांना अमेरिकेला जाण्यापासून रोखण्याचा प्रयत्न करत. अमेरिकेचे हवामान खूप गरम आहे, तिथे गुंड व डाकू लोकांचे राज्य आहे वगैरे अनेक अफवा ते पसरवत.

पण अमेरिकेत स्थलांतर केलेल्या मित्र आणि नातलगांची पत्रे काही वेगळंच सांगत. त्यांनी लोकांना अमेरिकेत येण्यास सांगितले. क्लाराचा प्रवास 1860 च्या दशकात सुरू झाला. त्यावेळी स्वीडनमध्ये दुष्काळ पडला होता आणि पिके नष्ट झाली होती. या कठीण परिस्थितीत हजारो लोकांना अमेरिकेत एक नवे आयुष्य सुरू करण्याची प्रेरणा मिळाली.

क्लाराच्या कुटुंबाने एका जहाजातून अमेरिकेचा प्रवास केला. या प्रवासाला सहा ते आठ आठवडे लागत. जहाज रस्ता चुकले तर प्रवासाला तीन महिने लागत. शतकाच्या अखेरीस आलेली नवीन वेगवान वाफेची जहाजे हाच प्रवास काही दिवसांतच पूर्ण करू लागली.

1855 साली कॅसल गार्डन हे स्थलांतरितांनी उतरण्याचे अधिकृत ठिकाण बनले. तिथे नोंदणी केल्यानंतर लोक ताजेतवाने होऊन अन्न खरेदी करू शकत, पैशाचे रुपांतर करू शकत, आपल्या भाषेमध्ये माहिती मिळवू शकत, जहाजे व रेल्वेची तिकिटे मिळवू शकत तसेच पुढच्या प्रवासाआधी तिथे आरामसुद्धा करू शकत.

क्लाराचे कुटुंब तिच्या आजोबांशी केवळ पत्रानेच संवाद साधू शकत. जमीन साफ करून झाल्यानंतर, त्यात पेरणी केल्यानंतर, घर बनवल्यानंतर आणि पिकांची कापणी केल्यानंतरच क्लाराच्या कुटुंबाला पत्र लिहिण्यासाठी वेळ मिळाला. मूळ देशातील आपल्या घरी लिहिलेल्या पत्राला त्याकाळी “अमेरिका पत्र” म्हणत.

क्लाराच्या आजोबांनी तिला दिलेली बियाणे *किराईत* नावाच्या वनस्पतीची होती. त्यावर सुंदर निळी फुले उगवतात. आजही ही फुले अमेरिकेतील बागांमध्ये विशेषत: मध्य-पश्चिमेकडील जंगलात पाहायला मिळतात.

**समाप्त**